केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे करीता दूरध्वनी व इंटरनेट जोडणीस मान्यता.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः शिप्रके-२०१४/ प्र.क्र.२१३/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई
तारीख: ३० ऑक्टोबर,२०१५.

**वाचा**

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः शिप्रके २०१३/ प्र.क्र.२८२/ आरोग्य-४, दि.२१.११.२०१३.**

२) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे/ राशीप्रकें/ दूरध्वनी व इंटरनेट सूविधा/ प्रस्ताव/ कक्ष-१५/१४, दि.२४.०९.२०१४.**

३) **अभियान संचालक तथा आयुक्त कु.क., राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र, क्रमांकः राआसो/ प्रशिक्षण/ रा.शी.प्र.कें./ दूरध्वनी व इंटरनेट सू.मंजूरी/ ४२६११-१३/२०१५, दि.२९.०९.२०१५.**

**प्रस्तावना**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे या कार्यालयाच्या आवारात सन १९८३ या वर्षापासून केंद्र शासनाच्या व युनिसेफच्या सहाय्याने शीतसाखळी उपकरणे देखभाल व दुरूस्ती प्रशिक्षण वर्ग भरविण्यात येतात. सदर केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्रामध्ये शीतसाखळी उपकरणांच्या संबंधीचे विविध संशोधन, अभ्यास, मुल्यवर्धनाची व क्षमता वाढीकरीता काम केले जात आहे. सद्यस्थितीत या केंद्राकरीता पायाभूत सुविधा उपलब्ध करणे, निवासाची व्यवस्था म्हणून वसतीगृहाची इमारत बांधकाम करणे आणि आवश्यक असलेले स्वतंत्र मनुष्यबळ उपलब्ध करणे यासंदर्भातील कार्यवाही सुरू आहे. या कार्यवाहीकरीता केंद्र शासन, युनिसेफ तसेच इतर राज्य शासनांची कार्यालये यांच्याशी वारंवार संपर्क साधणे आवश्यक असते. याकरीता या केंद्राकरीता एक स्वतंत्र दूरध्वनी व इंटरनेट जोडणीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती..

## शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे येथील कार्यालयाच्या परिसरात स्थित केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे करीता एक दूरध्वनी जोडणी व इंटरनेट जोडणी मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात आहे.

सदर दूरध्वनी व इंटरनेट जोडणी उपलब्ध करून देतांना संबंधित कंपन्यांच्या उपलब्ध पर्यायांपैकी कमीतकमी खर्चाचा पर्याय निवडावा व खर्चावर नियंत्रण ठेवावे.

या करीता आवश्यक खर्च केंद्र शासनाकडून महाराष्ट्र राज्याच्या राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत मंजूर सन २०१५-१६ च्या पी.आय.पी. मधून B.5.10.4 या लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.१४ येथील नियम क्र.६२ अन्वये प्रशासनिक विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांकरीता दूरध्वनी (दूरध्वनी यंत्राच्या खरेदीसह) मंजूर करण्याबाबत प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१४५३२३९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.30 16:42:25 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
४. अभियान संचालक तथा आयुक्त कु.क., राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई.स
५. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. प्रभारी, राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र, पुणे.
९. उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे.
१०. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).